**ग्रामीण पाणीपुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाकरिता - उन्नत महाराष्ट्र अभियानांतर्गत उच्च व तंत्र शिक्षण विभागाने मान्यता दिलेल्या संस्थांचा समावेश करण्याबाबत** तसेच निवड समिती स्थापन करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-२०१८/प्र.क्र.१७३/पापु-०७**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख - १४ जुलै २०२०

वाचा :

१) **पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७, दिनांक ०९ जुलै, २०१४
२) **पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११४/प्र.क.६१/पापु-०७,दिनांक १५ जून, २०१५
३) **उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांकः** बैठक-३६११/(५६)/(१५)/ताशी-२, दिनांक १३ जानेवारी, २०१६
४) **उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांकः** क्र. धोरण -३०११/(४५/१६) तांशी -२, दिनांक १५ जून , २०१६
५) **उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्रमांकः** क्र. धोरण-३०११/(४५/१६)/, ताशी-२, दिनांक ०५ जुलै, २०१७.

**प्रस्तावना :**

केंद्र शासनाच्या उन्नत भारत अभियानाच्या धर्तीवर राज्यात उन्नत महाराष्ट्र अभियान अंतर्गत राज्यातील विविध सामाजिक व विकासाशी संबंधित समस्यावर तंत्रज्ञानाचा वापर करून तोडगा शोधण्यासाठी राज्यातील अभियांत्रिकी महाविद्यालये, तंत्रनिकेतने व अन्य शैक्षणिक संस्थेतील विद्यार्थ्यांना सहभागी करून घेण्यासाठी उन्नत महाराष्ट्र अभियान( UMA) ही योजना राज्य शासनाने सुरू केली आहे.

उन्नत महाराष्ट्र अभियांनतर्गत असलेल्या तांत्रिक संस्थांचा पाणीपुरवठा व स्वच्छता विभागाच्या विविध ग्रामीण पाणीपुरवठा योजनांसाठी त्रयस्थ तांत्रिक परीक्षक म्हणून मूल्यांकन

करणाऱ्या संस्थांच्या यादीत समावेश केल्यास पाणीपुरवठा योजनांचे परीक्षण लवकर होण्यास मदत होऊन योजना विहित मुदतीत पूर्ण करण्यास मदत होईल. यासंदर्भात निम्न संस्थांना CTARA (Centre for Technology Alternatives for Rural Areas) , Indian Institute of Technology, Mumbai यांनी प्रशिक्षण देऊन त्यांची विविध योजनांतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करण्यासाठी शिफारस केली आहे.

त्या अनुषंगाने उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या उपरोक्त शासन निर्णयात नमूद संस्थांचा समावेश करण्याची तसेच भविष्यात अशा संस्थांच्या निवडीसाठी समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उन्नत महाराष्ट्र अभियान अंतर्गत राज्यातील पाणी पुरवठा व स्वच्छता विभागासाठी आवश्यक असणाऱ्या विविध योजनांतर्गत ग्रामीण पाणीपुरवठा योजनांचे त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करण्यासाठी (उच्च व तंत्रशिक्षण विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयात नमूद केल्यानुसार) संस्थांचा समावेश करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **संस्थेचे नाव** | **दर्जा** | जिल्हा |
|---|---|---|---|
| १. | घरडा इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, खेड, रत्नागिरी. | A | रत्नागिरी |
| २. | महाराष्ट्र इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, औरंगाबाद. | A | औरंगाबाद |
| ३. | प्रा. राम मेघे इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी अँड रिसर्च, बडनेरा, अमरावती. | A | अमरावती |
| ४. | राजारामबापू इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, इस्लामपूर, सांगली. | A | सांगली |
| ५. | अमृतवाहिनी कॉलेज ऑफ इंजीनियरिंग, संगमनेर, अहमदनगर. | A | अहमदनगर |
| ६. | शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालय, औरंगाबाद. | B | औरंगाबाद |
| ७ | कोल्हापूर इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी, कोल्हापूर. | B | कोल्हापूर |
| ८ | बापूसाहेब शिवाजीराव देवरे कॉलेज ऑफ इंजिनिअरिंग, धुळे. | B | धुळे |

१) याकरिता **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-१११४/प्र.क.६१/पापु-०७,दिनांक १५ जून, २०१५

परिच्छेद-४(२) मध्ये नमुद केलेल्या अटींपैकी " या निवडीमध्ये कोणतीही खाजगी संस्था सहभागी असणार नाही याची दक्षता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी घ्यावी, " ही अट शिथील करण्यात येत आहे. उर्वरित अटी किंवा शर्ती सदर शासन निर्णयात नमूद केल्यानुसार लागू राहतील.

२) तसेच भविष्यात पाणी पुरवठा व स्वच्छता विभागासाठी अशा संस्थांच्या निवडीसाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहें.

१. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई - अध्यक्ष
२. श्री. मिलिंद सोहोनी, अध्यासन प्राध्यापक CTARA मुंबई - सदस्य
३. विशेष कार्य अधिकारी, पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग मुंबई - सदस्य सचिव

I. या निवडीसाठी CTARA ,IIT ,Mumbai उपरोक्त संस्थेची क्षमता बांधणी करेल व त्याप्रमाणे शासनास शिफारस करेल.
II. उपरोक्त समिती सादर प्रस्तावांना अंतिम मान्यता दिल्यानंतर त्याप्रमाणे आदेश निर्गमित करण्यात येतील.
III. सर्व जिल्हयांसाठी अशा संस्थांची सम प्रमाणात नेमणूक करण्यात यावी .
IV. हा शासन निर्णय विभागाच्या सर्व योजनांसाठी (उदा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम, जल जीवन मिशन ,मुखमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम इत्यादी ) लागू असेल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००६३०१३०८३४२७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: CN = VASANT BHIMRAO MANE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = NA
Date: 2020.07.16 13:08:07 +05'30'

**(वसंत माने)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन,

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.मंत्री ( पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२

३. मा. राज्यमंत्री पाणीपुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव मंत्रालय मुंबई
४. मा. मंत्री ( सर्व )यांचे खाजगी सचिव मंत्रालय मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता विधानसभा महाराष्ट्र विधिमंडळ सचिवालय मुंबई
६. मा. विरोधी पक्षनेता विधान परिषद महाराष्ट्र विधिमंडळ सचिवालय मुंबई
७. मा. विधानसभा विधानपरिषद सदस्य सर्व महाराष्ट्र विधिमंडळ सचिवालय मुंबई
८. मा. मुख्य सचिव महाराष्ट्र राज्य यांचे उपसचिव मंत्रालय मुंबई
९. मा. अपर मुख्य सचिव ( पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग )/
१०. सचिव ( उच्च व तंत्रशिक्षण विभाग ) मंत्रालय मुंबई
११.सदस्य सचिव महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मुंबई
१२. श्री. मिलिंद सोहोनी, अध्यासन प्राध्यापक CTARA मुंबई
१३. संचालक भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणा पुणे
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद सर्व
१५. सह/ उपसचिव / विशेष कार्य अधिकारी सर्व पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग मुंबई
१६. संचालक पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था बेलापूर नवी मुंबई
१७. उपमुख्य कार्यकारी अधिकारी पाणी व स्वच्छता / कार्यकारी अभियंता ग्रामीण पाणी पुरवठा जिल्हा परिषद सर्व
१८.वरिष्ठ भूवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा सर्व
१९. अवर सचिव / कार्यासन अधिकारी (सर्व) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,मुंबई.
२०.निवड नस्ती पापु ०७ पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई